वस्त्रोद्योग धोरण अंतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक: धोरण-२०२४/प्र.क्र.३८/टेक्स-५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ३१ मार्च, २०२५

वाचा :-

१. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: धोरण-२०२४/प्र.क्र.३८/ टेक्स-५, दि.११ ऑक्टोबर,२०२४.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: पुनर्वि-२३२५/प्र.क्र.२३/२०२५/ १७ स, दि. ३१ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

वाचा येथील दि.११ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वस्त्रोद्योग धोरण अंतर्गत वस्त्रोद्योग घटकांना व्याज अनुदानाऐवजी भांडवली अनुदान या योजनेखाली रू.१४८६८.२३७२ (अक्षरी रुपये एकशे अठ्ठेचाळीस कोटी अडूसष्ट लाख तेवीस हजार सातशे वीस फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामधील परि. क्र.३, परि. क्र. ६(२) आणि परि.क्र.८ येथे सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार दि.११ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परि.क्र.३ मध्ये नमूद "वरील प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम संबधित बँकेस वितरीत करण्याकरीता श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्री.श्रीकृष्ण पवार, उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई, उपसचिव (Spinning Mills) (V०००९) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन ती सोबतच्या परिशिष्टात नमुद केलेल्या बँकांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी."

**ऐवजी**

"वरील प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम संबधित बँकेस वितरीत करण्याकरीता श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्री.श्रीकृष्ण पवार, उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई, उपसचिव (Spinning Mills) (V०००९) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून VPDA क्रमांक ७१०१०७००३६ या खात्यावर आहरीत करुन ती सोबतच्या परिशिष्टात नमुद केलेल्या बँकांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी", असे वाचण्यात यावे.

२.	दि.११ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परि.क्र. ६ (२) मध्ये नमूद "मंजूर निधी:- मागणी क्रमांक व्ही-२, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२)(७८) राज्य वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ अंतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान (कार्यक्रम) (३३, अर्थसहाय्य) (२८५१ ६५६५)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मध्ये या योजनेखाली सुधारित अंदाज सन २०२४-२५ मध्ये या योजनेखाली रु.२७०००.०० लाख निधी अर्थसंकल्पित आहे. या निधीमधून प्रस्तुत शासन निर्णयाअन्वये रू.१४८६८.२३७२/- (अक्षरी रुपये एकशे अठ्ठेचाळीस कोटी अडूसष्ट लाख तेवीस हजार तीनशे बाहत्तर रुपये फक्त) निधी वितरीत करण्यात येत आहे."

**ऐवजी**

मंजूर निधी:- "मागणी क्रमांक व्ही-२, २८५१ - ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (०२)(७८) राज्य वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ अंतर्गत वस्त्रोद्योग प्रकल्पांना व्याज अनुदाना ऐवजी भांडवली अनुदान (कार्यक्रम) (३३, अर्थसहाय्य) (२८५१ ६५६५)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मध्ये या योजनेखाली सुधारित अंदाज सन २०२४-२५ मध्ये या योजनेखाली सुधारित अंदाजान्वये रु.२७०००.०० लाख निधी अर्थसंकल्पित आहे. तसेच या लेखाशिर्षाखाली रु.४५९९.३५ लाख निधी पुनर्विनियोजनाव्दारे खर्च करण्यास उपलब्ध आहे. अशा प्रकारे २८५१ ६५६५ या लेखाशिर्षाखाली रु.१९८८१.५९७२ लाख इतका निधी खर्चासाठी उपलब्ध आहे. या निधीमधून प्रस्तुत शासन निर्णयाअन्वये रू.१४८६८.२३७२ (अक्षरी रुपये एकशे अठ्ठेचाळीस कोटी अडूसष्ट लाख तेवीस हजार सातशे वीस फक्त) निधी वितरीत करण्यात येत आहे.", असे वाचण्यात यावे.

३.	तसेच परि.क्र.८ मध्ये नमूद सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक-अर्थसं-२०२४/प्र.क्र.३२/अर्थ-३, दि.०१/०४/२०२४ तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५/०७/२०२४ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**ऐवजी**

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२६५/२०२५/व्यय-२, दि.२९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे, असे वाचण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३१२३१८१९१००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAMOD GANPATRAO PAWAR

Digitally signed by PRAMOD GANPATRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CO-OPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ba1df963775f8ead7f10c7f6fad8e2573f437f35d4b00e09a9b9c0ccdbf0d42a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5D6B51FDDC1FD566C46A6440D68EF83795379225572F777B66113D5833F98B04, cn=PRAMOD GANPATRAO PAWAR
Date: 2025.03.31 23:19:30 +05'30'

**( प्रमोद पवार )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (वस्त्रोद्योग), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, नागपूर.
४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
५. महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.

६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई(ई-मेलद्वारे).
९. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई(ई-मेलद्वारे).
१०. अवर सचिव (१७-स), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी (रोखशाखा) (३ प्रती ), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. परिशिष्ट अ मधील बँका (टफ सेल) (ई-मेल व्दारे).
१३. निवड नस्ती (टेक्स-५).